D:\HDO-Ir.r318

लेखा अनुदान २००१-२००२
मागणी क्रमांक बी-२३, मुख्यलेखाशीर्ष
७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन ज्ञापन क्रमांक:एचबीओ-०१००/२०९०/सीआर-३१८/आस्था-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ५ ऑक्टोबर, २००१.

वाचा :- शासन ज्ञापन क्रमांक:एचबीओ-०१००/२०९०/सीआर-३१८/आस्था-१, दिनांक ४ जून, २००१

शासन ज्ञापन :- वित्तीय वर्ष २००१-२००२ करिता मागणी क्रमांक बी-२३, मुख्यलेखाशीर्ष "७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे" अंतर्गत या विभागास रु.१७,८४,००,०००/- (अक्षरी रुपये सतरा कोटी चौऱ्यांशी लक्ष फक्त) एवढा निधी प्राप्त झालेला असून वर नमूद केलेल्या दि.४.६.२००१ च्या शासन ज्ञापनान्वये खुद्द गृह विभाग व क्षेत्रीय कार्यालय प्रमुखांना त्यांचे मागणी नुसार गौणशीर्षनिहाय चिन्हांकित करण्यात आलेला आहे.

२. शासन आता असे निदेश देत आहे की, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग एक ते पाच मधील अनुक्रमांक ११, १२, १२-अ व १४ येथील तरतुदीनुसार अनुक्रमे घरबांधणी अग्रीम, मोटार वाहन अग्रीम, संगणक अग्रीम व सायकल अग्रीम मंजूर करण्याचे अधिकार हे क्षेत्रीय कार्यालय प्रमुखांना प्रदत्त असल्याने या प्रयोजनाकरिता वर नमूद केलेल्या दिनांक ४ जून, २००१ अन्वये गौण शीर्षनिहाय चिन्हांकित करण्यात आलेली तरतूद ही उपलब्धही असल्याचे कृपया समजण्यात यावे. त्यानुषंगाने निधी उपलब्ध असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे. निधी उपलब्धता प्रमाणपत्राची वैधता दिनांक ३१.३.२००२ पावेतो राहील. त्यानुसार आपले आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचारी यांची वरील गौणशीर्षाखालील अग्रीम मंजूरीची प्रकरणे कृपया त्वरीत निकाली काढावीत. लाभार्थीला अग्रीमाची रकम मिळण्यास अकारण दिरंगाई होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. शासन असेही निदेश देत आहे की, ज्या क्षेत्रीय कार्यालयांनी दिनांक ४ जून, २००१ चे ज्ञापनास अनुसरुन "निधी उपलब्धता" प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठी शासनास प्रस्ताव सादर केले आहेत व शासनाने तशा अर्थाचे प्रमाणपत्र दिले आहे त्यांनी त्या प्रमाणपत्रानुसार प्रकरणे निकाली काढावीत. मात्र त्यानंतरही शिल्लक राहिलेल्या रकमेसाठी शासनास आता प्रस्ताव पाठविण्याची आवश्यकता नाही त्यांनी प्रतिक्षा यादीनुसार शिल्लक रकमेतील प्रकरणे नियमानुसार मंजूर करावीत. ज्या कार्यालयांनी निधी उपलब्धतेकरिता अद्यापी प्रस्ताव शासनास सादर केलेले नाहीत त्यांनी आता

GR-200201221257400000-0200

शासनास प्रस्ताव न पाठविता आपले स्तरावर संबंधित नियमातील तरतुदींच्या अधिन राहून अग्रीमाची प्रकरणे मंजूर करावीत. असे करतांना कुठल्याही परिस्थितीत चिन्हांकित निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी, अन्यथा नियंत्रण अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

४. वरील कार्यवाही करतांना संदर्भात नमूद केलेल्या दिनांक ४ जून, २००१ चे ज्ञापनात नमूद केलेल्या इतर अटींचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी. तसेच मंजूर केलेल्या अग्रीमाच्या आदेशाची प्रत, प्राधिकृत देय रकमेचे पत्र तसेच प्रमाणक क्रमांक, दिनांक व कोषागाराचे नाव इत्यादी माहिती शासनास तात्काळ सादर करावी. आपणास चिन्हांकित व आता उपलब्धही करुन दिलेल्या अग्रीमाच्या खर्चाचा व शिल्लक रकमेचा प्रमाणीत तपशील दर दोन महिन्यांनी शासनास सादर करण्यात यावा. वित्तीय वर्ष २००१-२००२ मध्ये मार्च २००२ पावेतो जेवढा निधी खर्च होईल तेवढाच निधी राखून ठेवावा व आवश्यकता नसलेला निधी आठमाहि सुधारित अंदाजामध्ये दिनांक १५ नोव्हेंबर, २००१ पर्यंत अथवा गरज नसल्यास तात्काळ शासनास परत करावा याची कृपया नोंद घ्यावी.

५. असेही निदेश देण्यात येत आहे की, चिन्हांकित व आता उपलब्धही करुन दिलेल्या रकमेचा खर्च ताळमेळ महालेखापाल यांचे कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका प्रकरण १४ तसेच नियम १५७ मधील परिशिष्ट ३ तसेच शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार योग्य प्रकारे व योग्य वेळी करुन त्याबाबतची प्रमाणीत माहिती शासनास विहित मुदतीत पाठविण्यात यावी त्याचप्रमाणे उपलब्ध करुन दिलेल्या निधीपेक्षा अधिक खर्च न करण्याची दक्षता घ्यावी. अधिक खर्चाच्या बाबतीत कोणत्याही स्पष्टीकरणाचा विचार करण्यात येणार नाही व त्यासाठी नियंत्रण अधिकाऱ्यास व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल. खर्च मेळची माहिती महालेखापाल यांचे कार्यालयाकडून प्रमाणीत करुन पाठविण्याची संपूर्ण जबाबदारी ही क्षेत्रीय विभाग / कार्यालय प्रमुख म्हणून आपली राहिल व त्याप्रमाणे प्रमाणित माहिती न पाठविणाऱ्या कार्यालयातील संबधितांवर जबाबदारी निश्चित करुन कारवाई करण्यात येईल. प्रमाणित न केलेली माहिती शासनामार्फत स्विकारण्यात येणार नाही व त्यामुळे विलंब झाल्यास संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय विभाग / कार्यालय प्रमुखाची राहिल.

६. वरील आदेशांचे काटेकोर पालन करुन २०१ घरबांधणी अग्रीमे / २०२ मोटार वाहन अग्रीमे / २०३ इतर वाहन अग्रीमे / २०४ संगणक खरेदी अग्रीमे या गौणशीर्षनिहाय अग्रीमाची प्रकरणे संबंधित नियमांच्या अधिन राहून, चिन्हांकित व आता उपलब्ध करुन दिल्याप्रमाणे निधीच्या मर्यादेत मंजूर करावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रि.इ.शेख )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

(कृ.मा.प.)

GR-200201221257A0000-0200